## १०० घरांचा पट

या विषयीं ७५ व्या डावाच्या आरंभीं या पटावरील डाव कसा खेळावा हें सांगितलें आहे. चौसष्ट घराच्या पटावरील खेळांत उत्कृष्ट बुद्धिवंताच्या चातुर्यास वाव नाहीं म्हणून त्यांना त्यांत पुरेंसें समाधान वाटत नाहीं, याकरितां बुद्धिबळाच्या हल्लींच्या पटाचीं घरें व मोहरीं वाढवून पहिल्याहून अवघड व बुद्धिचातुर्यास आणखी अवसर देणारा पट काढला पाहिजे, असें या खेळांतील कांहीं जगप्रसिद्ध खेळाडू म्हणूं लागले आहेत. मि. जे. आर. कॅपाब्लँका हे त्यांत प्रमुख आहेत. त्यांनीं १०×१०=१०० घरांचा एक पट सुचविला असून त्यांत हल्लींच्या सोंगट्या शिवाय हत्ती शेजारीं चॅन्सलर व मार्शल या नांवाचीं दोन मोहरीं कडेच्या पट्टींत ठेवावयाचीं. चॅन्सलर यास घोडा व उंट या दोहो मोहऱ्याची आणि मार्शल यास घोडा व हत्ती या दोघांची गति असून खेळणाराच्या मर्जीप्रमाणें कोणत्याहि एका गतीचा त्या त्या मोहऱ्यांनीं एका खेळीस उपयोग करावयाचा; अशी सुधारणा त्यांनीं सुचवून या खेळास ' Brighter Chess ' ( सवाई बुद्धिबळें म्हणजे त्रिवेंगडाचार्यांचा महाविलासच ) असें नांव देण्याचें योजिलें आहे.

या डावाचा प्रसार झाल्यास वरील इष्ट हेतु सिद्धीस जाईल आणि बुद्धिबळाचा खेळ हा बुद्धीच्या बळावाच आहे हें खरें ठरेल, असें त्याचें म्हणणें आहे.

ड्रेडनॉट चेसः—दुसरा असाच तऱ्हेचा डाव केपटाऊनचे कोणी मॅक्स रिक्स यानीं कल्पिला आहे. यांत ड्रेडनॉट नांवाचीं जादा मोहरीं असून, तीं एक घर तिरकस व दोन घरें सरळ अशा गतीनें जाण्याची योजना केली आहे.

डबल चेसः—हा युनायटेड स्टेटसूचे मि. ज्युलियन ग्रॅड हॉवर्ड यांनीं कॉपीराइट घेतलेला असा आहे. यात पट १६×१२=१९२ घरांचा असून बुद्धिबळें चौसष्ट आहेत.

निओ चेसः—( नवा बु. खेळ ) हा दोघांतच खेळण्याचा असून प्रत्येक बाजूस १ राजा, २ वजीर, ३ हत्ती, ४ घोडा, ५ उंट व ६.

" राज्ञोक्त कः स्व ? । तेनोक्त द्यूतकारोऽहं । राजन्, सारिफल सोलकठ च चतुरंग च कपर्दक च चोचलितमुष्टिक च गतागत दशचतुष्कं खेलितु जानामि."

यातील ' दशचतुष्क ' हा १०० घराचा पट आहे हें उघड आहे. प्रो. घोष यांना या पटाची माहिती नसल्यानें ' दशचतुष्क ' शब्दाचें मर्म त्यांच्या ध्यानीं आलें नसावें. जाता जाता सांगावयाचें तें असें कीं तैमुरलंग यास या खेळाचा नाद असून त्याच्या प्रखर बुद्धीला चालू खेळ अपुरा वाटला म्हणून, त्यानें १०×११=११० घराचा पट तयार करून त्यावर तो खेळत असे, असें स्टॉंटन म्हणतो. त्याच्या पटाची समग्र माहिती देता न आली तरी बुद्धिवंतास प्रस्तुत खेळ अपुरा वाटतो याचेंहि हें उदाहरण आहे.

एकदरींत हिंदी चतुरंगाचें रूपांतर बुद्धिबळांत होऊन त्यांतूनच 'महाविलास' निर्माण झाला हें स्पष्ट आहे आणि हे तिन्ही खेळ म्हणजे 'चतुरंग' 'बुद्धिबळ' आणि 'महाविलास' केवळ हिंदभूमींतच जन्मले, वाढले आणि विस्तारले यांत तिळमात्र संदेह नाहीं !

ग. रं. कु.

## संशोधनाविषयीं थोडी अधिक माहिती.

पं. त्रिवेंगडाचार्यांचा उल्लेख एका जर्मन नियतकालिकात इ० स. १८७३ त पुढील शब्दात आढळतो:—

'Trevengadacharya Shastree—Essays on chess, adapted to the Europeon mode of play. .... translated from original Sanskrit'—Bombay 1814 (ही माहिती प्रो. चक्रवर्ती यानीं कळविली आहे.) हें इंग्रजी भाषांतर (निवेदन पान २ पहा) हल्लीं मिळत नाहीं. त्यामुळें मि. क्रझ यानीं भाषांतर केलें कीं छापण्याचें काम केलें हें समजण्यास साधन नाहीं.

ग्रंथकारानें आपलें वर्णन श्री. बाजीराव पेशवे याच्या तोंडून केलें आहे. मात 'चिरमस्मानुगाश्रितः' (प्रस्ता० श्लो० ५ पृ. २) 'आमचे बहुत काळापासूनचे आश्रित' असें शब्द आहेत. सदाशिव माणकेश्वर व पंडित याचा जिव्हाळा आहे. यावरून त्रिवेंगडाचार्यांचें वास्तव्य महाराष्ट्रात बरेंच दिवस झालें असावें.

तसेच सदाशिव माणकेश्वर, त्रिंबकजी डेंगळ्यानंतर दुसऱ्या बाजीरावाचे प्रधान होते. त्याच्या कारकीर्दीत सुमारें १८०२ तें १८१४ च्या काळात वि. म. ची रचना झाली असावी. राघोबा व बाजीराव या पितापुत्राना गृहकलहामुळें इंग्रजाचाच आश्रय वराच घ्यावा लागला. त्यावेळीं बाजीराव त्याचे आश्रित त्रिवेंगडाचार्य याना युरोपियन लोकाचा सहवास घडून त्याच्या पद्धतींची माहिती पंडितानीं घेतली असावी. व पुढें ग्रंथ तयार झाल्यावर त्याचें भाषांतर—हें भाषांतर समग्र ग्रंथाचें कीं, त्यातील काहीं डावाचें, हें सागता येत नाहीं—मि. क्रझ यानीं छापून काढलें. या कालासबधी अधिक संशोधन झालें पाहिजे. सदाशिव माणकेश्वर इ. स. १८१७ त मृत्यु पावले.

पृष्ठ २१४ वर दिलेला सन १८२८–२९ हा काल आमच्या पोथीचा लेखनकाल आहे. रचनेचा नव्हे.

\+ \+ \+

वा० हि० बु० चा काल निश्चित होण्याचें मुख्य साधन म्हणजे 'लक्ष्मणा' चा ग्रंथ सापडून त्याचा काल निश्चित होणें, हें होय.

त्रिवेंगडाच्यार्यांच्या वेळेला त्यातील,मृतिका=भात वेध=शह; बिंदुक[1] =बुर्जि; व वजीराची अडीचाची गति हे शब्द मुळीच प्रचारात नसावेत. यावरून सदर शब्दाचा पूर्ण विसर पडण्यास व त्या ऐवजीं परकीय भाषेतील शब्दाचा प्रवेश होण्यास लागणारा कालावधि मानला आहे. उत्तरहिंदुस्थानात व दक्षिणेंत मुसलमानी राज्य चिरस्थायी होण्यापूर्वीचा म्हणून या ग्रंथाचा काल दहा ते बारा शतकाच्या पूर्वीचा मानला आहे. ही त्या कालाची उत्तर मर्यादा आहे. शिवाय यात, ओरी खेळास दिलेलें महत्व; निवळ प्याद्यानीं राजास खेळतां येत नाहीं हें सांगणें, वजीराची प्राथमिक अडीच घराची चाल, घोड्याचें उड्डाण; प्याद्याच्या पुनरुजीवनाचा उहापोह, टीकेंतील अनेक ग्रंथकाराचे उल्लेक, यावरून बुद्धिबलाच्या परिणतावस्थेचा मध्यकाल असावा. अर्थात् हें अनुमान असून आणखी भक्कम पुरावा मिळणें अवश्य आहे.

या ग्रंथाचा लेखक व लेखनकाल याचा शोध करून संशोधनाचा प्रकाश पडणें अगत्याचें आहे.

मूल श्लोक आठ असावेत असे ' टीका बुद्धिबलाष्टके कुर्वे, ' असें टीकाकाराच्या पहिल्या श्लोकावरून दिसतें, परंतु सर्व श्लोक उपलब्ध नाहींत. व या आठ श्लोकाचा कर्ता व टीकाकार हे भिन्न असावेत हेंहि श्लोक व टीका यातील अपचालित=ग्रीवतो या शब्दाच्या अर्थांवरून वाटतें.

+ + +

मराठी ग्रंथात एकनाथकृत ( इ स.१५४८ ते १६०९ ) भावार्थरामायणात ( बालकांड ११.२४९. ) बुद्धिबळाचा उल्लेख असा आहेः—

जैंवि बुद्धिबळें वाडें कोडें । मिथ्या राजा प्रधान हत्ती घोडे ॥

० ० ०

---

[1] बिंदुक [ बिंदु + क ; कः—लघुता दाखविणारा प्रत्यय; ]=शून्य.

कोणत्याही गोष्टीचा अभाव दाखविण्यास बिंदु किंवा शून्य घालून दाखवितात. बिंदुकः हा शब्द या डावात सर्व मोहऱ्याचा अभाव दाखविणारा शब्द आहे. बिंदुलें=शून्य. पहा ज्ञानेश्वरी अ. ९ ओ. ४६१

मग जाती व्यक्ती पडे बिंदुलें । जेव्हा भाव होती मज भीनलें ।

# 'बुद्धिवळां'तील शब्दांची वंशावळ.

| चतुरंग | बुद्धिवळ | मराठी | मुसलमानी (पर्शियन) | इंग्रजी |
|---|---|---|---|---|
| १ चतुरंग | बुद्धिवळ | बुदवळ, बुद्धिवळ. | शतरंज, सदरंज शतरंग, नर्द. | Chess |
| २ क्रीडाचक्र अष्टकोष्टी. | खेलनांगण पट | पट | बिसाती शतरंज. | Chess-board, |
| ३ बल | व्यक्ति, बल. | बुदवळ, सोंगटे, नरद. | मुहरा नरद. | Piece, Chess-men |
| ४ राजा. | राजा. | राजा. | शाह. | King |
| ५ ० | प्रधान, मंत्री. | वजीर. | फर्जीन, वजीर, | Queen. |
| ६ हस्ती. | हस्ती. | हत्ती. | रुख Tower, | Rook. |
| ७ अश्वः | अश्व. | घोडा. | अस्प, फर्स, | Knight |
| ८ नौका, तरी. | उष्ट्र. | उंट. | फिल. | Bishop |
| ९ पत्ति, घटी. | पत्ति, पदाति, | प्यादा–दें | पियादा. | Pawn |
| १० विंधन ? | वेधन, वेधः | शह. | शाह (कर्दन) | Check |
| ११ काक्काष्ठ ? | निरुंध. | बुर्ज. | बुरुजि. | ० |
| १२ हनन | मृतिका. | मात. | मात (Dead) | Mate |
| १३ ० | पत्तिमृतिका ? | प्यादेमात, | शाहमात | Ch-mate |

हिंदुस्थानांतून इराण, तेथून अरबस्तान, इटली, स्पेन, फ्रान्स, जर्मनी व इंग्लंड अशा क्रमानें पुढें हा खेळ प्रसार पावला आहे. म्हणून पर्शियन व इंग्लिश नांवांत साम्य दिसत नाहीं.

आणखी बुद्धिबळावर संस्कृत ग्रंथ उपलब्ध होतील त्यात 'विषम' डावासंबधीं ( games with odds ) उहापोह केलेला आढळून येईल. इटॅलियन ग्रंथकार करीरा ( १६१७ इ. स. ) याचा या विषयावर ग्रंथ आहे. त्यातील बरेचसे उतारे स्टौंटन देतो. त्यावरून त्यास प्रत्यक्ष, नसला तरी भाषांतरीत असा एखादा हिंदुचा ग्रंथ मिळून, त्या आधारानें तो लिहिला असावा मुसलमानी राष्ट्रांस विषम डाव प्रिय असत असें म्हणतात. परंतु ही वाढ मूळ हिंदुस्थानातच झाली असली पाहिजे, असें एकंदर या खेळाची या उपलब्ध संस्कृत ग्रंथावरून जी परिणति दिसते, त्यावरून वाटतें. चतुरंगातून फाशाचें उच्चाटन झाल्यानंतर निव्वळ बुद्धिबळावर खेळ येऊ लागला. परंतु दोघांच्या बुद्धि सारख्या असणार कशा ? तेव्हा अधिक बुद्धिवानावर जादा बौद्धिक वजन ( load ) घालून व दुसऱ्यास काहीं सवलती देऊन दोन्ही बाजू समान करण्याचा प्रकार सुरू होणें ओघानेंच प्राप्त झालें त्यामुळें विषम डावाची निर्मिति झाली या देशावर मुसलमानाचे अतिक्रमण होण्याच्या पूर्वीच्या काळात बरेच लिखाण झाले असावे हा युद्धनिदर्शक खेळ असल्यामुळें युद्धातील नानाप्रकारची व्यूहरचना व त्याचें भेदन करणें, हेही बुद्धि बळावरील ग्रंथात असण्याचा संभव आहे. ( डाव ८० ची रचना पहा )‡

० ० ० ०

बुद्धिबळाचा आरंभ इ. स च्या ५ शतका पर्यंत लागतो (उपो. पृ. १८ ) त्यानतर सुमारें तीन चारशें वर्षात, गुप्त वगैरे हिंदुसाम्राज्याच्या भरभराटीचे काळांत या विषयावर ग्रंथरचना होणें संभवनीय आहे

० ० ० ०

‡ ' . It was not till after chance had been abolished in the regulation of the game, that the art of giving odds was made a study and a system then indeed the game became a trial of pure skill It is reasonable to suppose, no long time would elapse before (p 380) the genius of players has devised to obviate the inequality of skill between competetors (p VI) . Such Eastern works on odds, are very rare Staunton-Chess player's Companion, p 380

## ' विलासमणिमंजरी 'चीं हस्तलिखितें.

विलासमणिमंजरीची एक हस्तलिखित प्रत आम्हास प्रथम इसवी सन १९२८ त मिळाल्याचें आम्हीं ता. १७।८।१९२९ च्या ' केसरी 'त जाहीर केलें. तसेंच ' महाविलास ' ( १०० घराच्या पट–पद्धतींची माहिती ) ता. ५ व १२ जानेवारी १९३० च्या मद्रासच्या ' हिंदु इलस्ट्रेटेड वुइक्लींत ' इंग्रजींत प्रसिद्ध केली. प्रस्तुत ग्रंथाच्या प्रतीचा आम्हास कसकसा शोध लागत गेला हें आता सांगतों.

१. कोल्हापूर प्रत — ही आम्हास इ. सन १९२८ त मिळाल्याचें वर सांगितलेंच आहे. ही चांगल्या चिवट कागदावर लिहिलेली पोथीच्या आकारात (७" × ११") आहे. पोथी बहुतेक पूर्ण असून सुंदर, स्वच्छ व वळणदार बालबोध अक्षरांत लिहिली आहे. इच्या पूर्व व उत्तर खंडाचीं पृष्ठे अनुक्रमें ५२ व ५३ असून १ लें पृष्ठ गहाळ आहे. त्यामुळें आरंभींचे १० श्लोक नाहींत. शेवटचें पृष्ठ थोडेसें कसरींनें खाल्लेलें असून त्यावर पोथीचा लेखनकाल व ग्रंथसंख्या नमूद आहेत. प्रत्येक डावाखालीं मराठी भाषांतर आहे.

२. पुणें प्रत — ' आनंदाश्रम ' पुणें या संस्थेतील नं. ३५५७. उपलब्ध वर्ष १९३१. अपुरी. सर्व संस्कृत मांडणीत. प्रस्तावना व १ ते ६४ डाव आणि १ ते ८ डावांचीं उत्तरें एवढाच या प्रतींत मजकूर आहे. त्याची नक्कल आम्हीं करवून आणिली.

इतिहाससंशोधक कै. वि. का. राजवाडे यांच्या संग्रहांतील प्रतीवरून ' संशोधक ' मासिक वर्ष १ ते ३ मध्यें १९३३-३५ त क्रमशः छापलेली.

३. धुळें प्रत — संपादक आणखी एक हस्तलिखित मिळाल्याचें पृ. ३ वर लिहितात. परंतु दोन्ही प्रतींचें वर्णन करीत नाहींत. छापील प्रत बहुतांशीं पूर्ण. पण तींत अनेक अशुद्धे वगैरे चुका फार झाल्या आहेत. त्यापैकीं बऱ्याच आमच्या पुस्तकांत सर्वत्र दाखविल्या आहेत. त्यांसाठीं या पुस्तकाची १०६,

११६, १३१, १६२, १६७, १७२, १७८, १८९, १९४, २१२ इ. पृष्ठे पहावींत. शेवटच्या ९६ वे १०० डावाचा मजकूर छापण्यात प्रश्नोत्तरातील मजकुराची गलत झाल्यानें आलेली दुर्बोधता आमची पोथी नसती तर मुळींच गेली नसती. दोन्ही पोथ्यांतील त्या मजकुराचीं फाटकीं पानें कल्पनेनें जुळवून मजकुराची मांडणी केली असावी असें दिसतें. पोथ्या धड कीं फाटलेल्या आहेत, याबद्दल संपादकीय मजकुरात मुग्धता स्वीकारली असली, तरी पोथी फाटलेली असावी, हे सत्य पृ. ८३ वरील टीपेंत "मूळ दोन्ही पोथ्यांत एवढा तुकडा जुळत नाहीं" या टीपेच्या रूपानें बाहेर पडलें आहे ! या चुकाचें भानहि संपादकास नाहीं ! यापेक्षा मिळालेल्या पोथ्यांची वस्तुस्थिति वर्णन केली असती तर बरें झालें असतें. संस्कृत मजकूर छापण्यांत शुधि करण्याचे नियम न पाळल्यानें तो वाचताना फार प्रयास पडतात. असो. संपादक, रा. रा. विष्णु हरि नित्सुरे. प्रकाशक, भास्कर वामन भट, चिटणीस:–राजवाडे संशोधन-मंदिर, धुळें. संपूर्ण छापील प्रत १९३६ च्या मार्च महिन्यात मिळाली.

धुळें प्रतींत झालेल्या या चुका शोधून त्या दाखविण्यास आम्हांस वेळ मोडून फार श्रम घ्यावे लागले त्यामुळें या पुस्तकांत कांहीं पानें निष्कारण वाढून त्या मानानें खर्चहि वाढला आहे. तथापि 'राजवाडे संशोधन–मंदीर' या संस्थेच्या चालकाच्या नजरेस ही गोष्ट आणून यापुढील त्यांचें नवीन प्रकाशन अधिक काळजीपूर्वक व्हावें या हेतूनें हा चुका दाखविण्याचा खटाटोप केला आहे ! हा ग्रंथ धुळ्यास प्रसिद्ध होत असल्यानें या ग्रंथाचें प्रकाशन करण्याचा आमचा रहित केलेला बेत त्या प्रतीच्या चुका नजरेस आल्यानंतर पुन हातीं घेऊन ही आवृत्ति काढावी लागत आहे.

४ कलकत्ता प्रत — हिंदुस्थानसरकारच्या पुराणवस्तुसंरक्षक खात्याकडून एक बहुमोल व प्रचंड ग्रंथसंग्रह रॉयल एशियाटिक सोसायटी, कलकत्ता ब्रँच या संस्थेच्या स्वाधीन केला गेला, त्यांत मिळाली ही प्रत अपुरी असून तींत दुसरा स्तबकच नाहीं व ४ ध्याचे फक्त दोन श्लोक आहेत, असें संस्थेचे एक अधिकारी प्रो. चिंताहरण चक्रवर्ती एम्. ए. काव्यतीर्थ, यांजकडून आम्हांस समजलें.

# बुद्धिबळाचा खेळ खेळण्याचे नियम.

[ग्रंथकार त्रिवेंगडाचार्य यांनीं आपल्या प्रस्तावनेंत खेळण्याच्या देशी विदेशी सर्व पद्धतींची संक्षिप्त माहिती दिली आहे. तथापि अगदीं नवीन खेळाडूंस उपयोगी पडेल अशी विस्तृत माहिती देण्याविषयीं प्रकाशकानीं आग्रहाची सूचना केल्यावरून हा भाग पुस्तकास आरंभीं जोडण्यात येत आहे.

खेळाच्या अनेक पद्धतींपैकीं हिंदुस्थानांत पूर्वापार चालत आलेली व अद्यापि आमच्या जुन्या पिढींतील मंडळी, जिचा सररहा उपयोग करतात ती, हिंदुस्थानी पद्धति आणि नवीन पिढींत जिचा प्रसार एक सारखा वाढत असून जी अखेर मान्य होणार अशी चिन्हें दिसत आहेत ती, युरोपीयन–इंग्लिश पद्धति, या दोनच पद्धतींची माहिती पुढें दिली आहे. पुढें दिलेल्या नियमांवरून खेळ खेळण्याइतकें व या पुस्तकांतील डाव समजण्याइतकें ज्ञान होईल. प्राविण्य आगीं येण्यास आपल्याहून वरचढ खेळणाराशीं खेळण्याची सवय ठेवावी. व प्रसंग विशेषीं त्यास डावांतील वजीर काढावयास लावून खेळावें.]

सूचनाः–देशी व विदेशी खेळण्याच्या पद्धतींत साम्य पुष्कळच आहे व त्यांतच दोन्ही पद्धतींतील फरक जेथल्या तेथें दाखविले आहेत. **इंग्लिश पद्धतींतील विशेष फरक जाड अक्षरांनीं दाखविले आहेत.**

## नियम

(१) हा खेळ दोन सामनेवाल्यांत ह्मणजे खेळाडूंत होतो. एक-मेकास परपक्ष, प्रतिपक्षी, विरुद्धबाजू, उलटी बाजू असें संबोधण्यात येतें.

(२) डावांत खेळावयाचीं सोंगटीं दोन रंगांचीं असतात. देशी पद्धतींत तांबड्या आणि हिरव्या; आणि विलायतींत पांढऱ्या व काळ्या रंगाचीं असतात. प्रत्येक खेळाडूस एकेक रंग असतो.

(३) प्रत्येक बाजूला एक राजा, एक वजीर, दोन हत्ती, दोन उंट, दोन घोडे आणि आठ प्यादीं मिळून प्रत्येकास सोळा व दोघांचीं मिळून

एकदर डावात ३२ सोंगटीं म्हणजे बुदबळ असतात. त्यांना इंग्रजींत Pieces ( पीसीस् ) म्हणतात आम्ही त्यास सोंगटीं ( बुदबळें ) असें नाव दिलें आहे. बुदबळें लाकूड, हस्तिदंत वगैरेपासून बनवितात.

(४) खेळाच्या आरंभीं दोनी पक्ष समबल ( सारख्या शक्तीचे ) असतात.

काळा सुरवातीची मांडणी. ( विलायती ) १६

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ह | घो | उ | व | रा | उ | घो | ह |
| प | प | प | प | प | प | प | प |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| प | प | प | प | प | प | प | प |
| ह | घो | उं | व | रा | उं | घो | ह |

पांढरा ( जाडा ) १६

(५) प्याद्याखेरीज बाकीच्या सोंगट्यास ' मोहरीं ' म्हणतात. राजाची गणना ' राजा ' अशीच स्वतंत्र असते.

(६) हा खेळ ( वरील आकृतींत दाखविल्याप्रमाणें ) ८×८=६४ घराच्या चौरस पटावर खेळतात. पट कापडाचा, लाकडाचा, किंवा जमिनीवर खडूनें रेषा काढूनहि बनवितात. व तो दोन खेळाडू आपल्यामध्यें टेवून आकृतींत दाखविल्याप्रमाणें सोंगटीं मांडून खेळतात. ( रा=राजा; ह=हत्ती, उ.=उंट, घो.=घोडा, प=प्यादा )

(७) आकृतींतील मांडणी विलायती पद्धतीची आहे. त्यांत प्रथम खेळणाराच्या म्हणजे पांढरा रंगवाल्याच्या उजव्या हातास राजा व डाव्या हातास वजीर असतो व दुसऱ्या बाजूचे राजा व वजीर पहिल्याच्या राजासमोर राजा, आणि वजीरासमोर वजीर असे मांडतात. पण हिंदी पद्धतींत प्रत्येकाचा राजा व वजीर हे अनुक्रमें त्याच्या उजव्या डाव्या बाजूस असतात.

(८) खेळांतील सोंगट्यास खालील गति ( चाली ) आहेत:-

(अ) समोर, सरळ, पुढें अथवा मागें, उजव्या किंवा डाव्या हातास एक अथवा अनेक घरें जाणें.

(ब) तिरकस गतिनें मागें पुढें कोनऱ्यानें कर्णरेषेनें-जाणें.

(क) अडीच घराची गति, कोणत्याही बाजूस दोन घरें समोर जाऊन एक घर उजवीकडे किंवा डावीकडे आडवें जाणें यास अडीच घराची गति म्हणतात. वास्तविक ही तीन घराची गति असता दुर्दे जाऊन नंतर आडवें जावें लागतें, म्हणून अडीच घराची गति म्हणतात.

(ड) बुरुजांत जाणें ( कॅसलिंग Castling ) वटबंदी करून घेणें.

कॅसलिंग म्हणजे, राजा व हत्ती हे जागचे हलण्यापूर्वी व त्यांच्या दरम्यानचीं सर्व मोहरीं वेंधून बाहेर गेलेलीं असलीं म्हणजे जरूरीप्रमाणें राजास मोहद्याच्या घरीं व हत्तीस उंटाच्या घरीं एकदम जाण्याचा अधिकार. हा वरील अटी पाळून एकच वेळ वजावतां येतो. राजा व हत्ती या दोघांस हलविण्याची एकच खेळी मानतात. मात्र राजास शह आल्यास हा अधिकार सवड असूनहि वजावतां येत नाहीं. त्याचप्रमाणें राजाला कॅसलिंग करतांना ज्या घरीं ठेवावयाचें त्या

घरावर प्रतिपक्ष्याचा मारा असल्यासही हा अधिकार चालवितां येत नाहीं.

(इ) चालत असतांना मारणें–En passent–या प्रकारांत मारणारें प्यादें आपल्या पांचव्या घरीं असावें लागते, व परपक्षाचें प्यादें, मारणाऱ्या प्याद्याच्या शेजारच्या कोणत्याहि पट्टींत, आपल्याच घरीं असून, दोन घरें जाण्याचा आपला अधिकार बजावणारें असें असावें लागतें. म्हणजे एक घर जातांना जसा त्यानें परपक्षाचा मार खाल्ला असतां तसाच, त्याला दोन घरें गेल्यासहि खावा लागतो. मार खाणारें प्यादें मरतें व त्याच्या पुढील घरांत हें मारणारें प्यादें येतें. एकंदरींत मारणारें प्यादें घोड्याच्या चालीप्रमाणें दीड घर जातें म्हणावयाचें.

(फ) हिंदुस्थानी पद्धतींत कॅसलिंग व चालत असताना मारण्याचा (en passent) नियम नाहीं.

(९) बुद्धबळाच्या गति ( चाली ) व अधिकार

(१) राजा –हा शेजारच्या कोणत्याहि एका घरांत सरळ अथवा तिरकस जाऊं शकतो. मात्र अशा जाण्याच्या ठिकाणीं शत्रुपक्षाचा जोराचा मारा नसला पाहिजे. राजास शह मिळण्यापूर्वी फक्त एक वेळ घोड्याप्रमाणें अडीच घरें जाण्याची मुभा हिंदुस्थानी ( देशी ) पद्धतींत आहे. या ऐवजीं विलायती ( इंग्रजी ) पद्धतींत राजास सुरक्षित ठिकाणीं जाण्यासाठीं कॅसलिंग ( बुरुजाव जाणें ) ही सवलत ठेविली आहे

(अ) राजा प्रतिपक्षाच्या राजाशेजारीं जाऊं शकत नाहीं.

(५) राजा डावांत अखेरपर्यंत असतो. तो मरत* नाहीं. राजे एकमेकांस मारत नाहींत.

(२) वजीरः—हा सरळ किंवा तिरकस, मागें अथवा पुढें, वाटेल तितकीं घरें जातो. मात्र वाटेंतील घरें मोकळीं पाहिजेत. परपक्षाचें बुदबळ मध्येंच आलें तर, त्याला मारून घेऊन त्या जागीं बसतो व तें आपल्याच रंगाचें असल्यास त्याच्या जवळच्या घरीं थांबतो. उडी मारून जात नाहीं. सर्व मोहऱ्यांत हाच सर्वांत बलिष्ठ आहे. कारण, यांत हत्ती व उंट यांच्या गतींचा संयोग आहे.

(३) हत्ती.—हा केव्हांहि सरळ, आडवा अथवा उभा, मागें व पुढें जातो. त्यास तिरकस गति नाहीं. यामुळें तो वजीराच्या खालोखाल सामर्थ्यवान् आहे. वाटेंत आलेल्या बुदबळासंबंधानें वजीराप्रमाणेंच यास थांबावें लागतें.

(४) उंटः—हत्तीस ज्या प्रमाणें फक्त सरळ जाता येतें, त्याप्रमाणें उंटास फक्त तिरकस जाता येतें. बाकी सर्व नियम वजीर व हत्तीप्रमाणें म्हणजे उंट हें मोहरें हत्तीहून कमी प्रतीचें आहे. दोन्ही बाजूचे उंट एका नळकांडींत असतात तेव्हां त्यास 'एकपगी' म्हणतात.

(५) घोडाः—हाच फक्त अडीच घरें जाणारा मोहरा आहे. आणि उंट हत्ती व वजीराप्रमाणें न थांबतां मार्गांत असलेल्या बुदबळावरून उडी मारून जातो. याच्या गतींत समोरतालचीं आठ घरें मिळतात. घोड्याच्या टप्प्यांतील आठ घरें आकृतींत दाखविलीं आहेत.

आकृतींत घोड्यापासून १, घोड्यापासून २, घोड्यापासून ३ इ. ८ पर्यंत अडीच घरें आठ होतात. अशीं कोणत्याहि घरापासून दुसरीं अडीच घरें समजावीं. (पृष्ठ ३६ वरील आकृति पहा.)

---

* चतुरंगांत राजे मरत. सिंहासन घेणें, शत्रुराज्यांत प्रवेश करणें, महालाची मोहरी घेणें इ. प्रकारांनींहि जें विजयाचें स्वरूप दिलेलें आहे, त्यांतील दोन भेद 'बुद्धिबळांत' काढून टाकून पराजास युद्धांत माराय-याचा हा एकच उरलेला प्रकार ठरविला गेला. मात्र धा. पु. हि. च्या टीकेंत पृ. २२१ वर, 'नृवर भनुनिग्राह्' असें टीकाकार म्हणतो.

## घोड्याची चाल.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | |
| | | १ | | २ | | | |
| | ८ | | | | ३ | | |
| | | | घो | | | | |
| | ७ | | | | ४ | | |
| | | ६ | | ५ | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |

( ४ ) वजीर, हत्ती, उंट, घोडे हीं मोहरीं परपक्षाच्या बुदबळास मारू शकतात, स्वपक्षाच्या बुदबळास जोर करतात. मेल्यावर जिवत होतात. प्यादें मात्र जिवत होत नाहीं.

मोहरीं पुढें जातात व मागें येऊं शकतात व डाव्या उजव्या बाजूसही आपल्या अधिकाराप्रमाणें जातात परंतु प्यादें फक्त पुढेंच जातें. मागें अथवा बाजूस जाऊं शकत नाहीं.

( ६ ) प्याद्यांच्या गति :—

( अ ) प्यादें सरळ पुढें फक्त एक घर जातें, मागें अथवा बाजूस जात नाहीं.

( ब ) मारण्याच्या वेळीं उजव्या किंवा डाव्या बाजूस पुढें तिरकस जातें.

( क ) राजा, वजीर व दोन हत्तींच्या पुढील प्यादीं प्रथम खेळीस दोन घरें जाऊं शकतात.

इंग्रजी डावांत कोणतेंही प्यादें असें दोन घरें जाऊं शकतें.

( १० ) मोहरी जिवंत करणें. *

आठव्या घरीं पोंचलेल्या प्याद्याबद्दल त्या घरचें मोहरें-मूळ तें मोहरें पटात नसेल तर जिवंत करता येतें. व मूळचें प्यादें पटातून काढून टाकावें लागतें.

( ११ ) घोड्याच्या आठव्या घरीं प्यादें गेलें म्हणजे त्याचा घोडा होतो. त्यावर प्रतिपक्षाचा मारा नसेल तर जिवंत होताक्षणींच तो घोडा आपल्या गतीनें ( २॥ घराच्या ) पाहिजे तेथें उडी मारतो. पण घोड्याच्या आठव्या घरीं परपक्षाचें मोहरें असून, तें मारून घोडा होत असेल, किंवा घोडा होणाऱ्या अडीचाव्या घरीं परपक्षाचा राजा असेल किंवा घोड्याच्या आठव्या घरावर प्रतिपक्षाचा मारा असेल, तर घोडा होनाच उडत नाहीं. हा मारा परपक्षाच्या राजाचा असेल आणि घोडा होण्याकरता जाणारें प्यादें जोरात असेल, तर तो राजा मारू शकत नसल्यानें, तो घोडा उडू शकतो.

राजाचें प्यादें आठव्या घरीं गेल्यास त्याचा वजीर होतो.

इंग्रजी पद्धतींत प्यादें मोहऱ्याच्या आठव्या घरीं गेल्यास त्याचें कोणतेंही मोहरें होतें. मग मूळचें प्यादें जिवंत असो अगर नसो. किंवा मोहरें जिवंत न करतां प्यादें तसेंच ठेवतां येतें. म्हणून एकापेक्षां अधिक वजीर दोहोंपेक्षां अधिक हत्ती, उंट, घोडे होऊं शकतात.

इंग्रजी पद्धतींत प्याद्यास चालत असतांना मारण्याचा ( en passent ) चा अधिकार आहे. हा हिंदी पद्धतींत नाहीं.

१२ शह आणि त्याचे प्रकार.

( १ ) राजा हा इतर मोहऱ्याप्रमाणें मारला जात नाहीं. परंतु परपक्षाच्या युद्धबळाच्या माऱ्यात सांपडला असता त्यास ' शह ' लागला असें म्हणतात.

---

* मोहरी जिवंत करण्याची कल्पना मूळ चतुरंगांतील असून प्यादें शेवटच्या घरीं जाणें, यास 'षट्पद' असें स्वतंत्र नांव दिलें आहे; कारण प्याद्यास आपलें स्थान सोडून सहा घरेंच चालावें लागतें.

( २ ) असा ' शह ' देतानां इंग्रजी पद्धतींत ' शह ' म्हणून उच्चारावें लागतें.

[ हा उच्चारण्याचा प्रकार हिंदु पद्धतींत सरूहा नाहीं व तो असणें इष्ट आहे, असें पं. त्रिवेंगडाचार्यांनीं या पुस्तकात ठिकठिकाणीं 'शाहं वदेत्' असें म्हटलें आहे यावरून वाटतें. बा. हि. क्री. मध्यें ' वेध ' हा शब्द लावला आहे. तोहि प्रचारात आल्यास ठीक होईल.

मराठींत शह देणें या अर्थी शब्द मिळत नव्हता. वि.म. त सर्वत्र ' शाहं ' दद्यात्, ' नृपं वदेत् ' अशी शब्दयोजना आहे. तो शब्द' वेधनं ' ' वेध ' हा आता पुन्हा मिळाला. मूळ चतुरंगात ' बिधन ' हा शब्द त्या अर्थी असावा असें दिसतें. त्याचें भाषांतर प्रो. घोष *obstruct* या इंग्रजी शब्दानें करतात. व हा शब्द पाणिनींत मिळत नाहीं असेंहि लिहितात ( चतु. दीपि. पृ. १२ ) वेधन हा शब्द चंद्रसूर्यांस राहूकेतूचा ' वेध ' लागतो या कल्पनेतून निघाला असावा. ]

नाशहः--शह लागलेल्या राजास,

( ३ ) त्या घरातून शह चुकेल अशा प्रकारें हलविणें भाग आहे किंवा,

( ४ ) शह देणारें मोहरें व तो राजा यांच्यामध्यें आपलें एखादें बुदबळ आडवें घालून तो शह चुकवावा किंवा,

( ५ ) शह देणारें बुदबळ मारता येण्यासारखें असेल तर तें मारावें.

(६) या सर्व प्रकारास ' ना शह ' करणें असें म्हणतात. एका पक्षानें शह दिल्यानंतर दुसऱ्यास ' ना शह ' करणें भाग आहे. ' ना शह ' करताना या तीन प्रकारातील जो सर्वांत फायदेशीर होईल तो घ्यावा. घोड्याचा व प्याद्याचा ' शह ' राजाला हलवून अथवा शह देणारें सोंगटें मारून काढावा लागतो.

(७) ' ना शह ' करणें अशक्य होईल तर त्याजवर डाव होतो. म्हणजे खेळ पुरा होतो. राजे केव्हांहि एकमेकाजवळ म्हणजे एकास एक लागलेल्या घरात येऊ शकत नाहींत, व एका बाजूच्या बुद-

बळाच्या गतीच्या मोकळ्या मार्गांत ( बुदबळानें रोधलेल्या पट्टींत ) उलट बाजूचा राजा येऊ शकत नाहीं; तसा तो येणें म्हणजे तो 'शहात' प्रतिपक्षाच्या जागेंत येणें होय.

काटशह:—कोणत्याहि बाजूचा राजा व दुसऱ्या बाजूचें मोहरें यांच्या दरम्यान ( मध्यवर्ती ) असणारें दुसऱ्या बाजूचें बुदबळ, बाजूस सरकवून, राजा मोहऱ्याच्या मार्गांत आणता आल्यास, त्यास काटशह केला असें म्हणतात; आणि अशा वेळीं वर नियमामध्यें सांगितल्या प्रकारानें 'ना शह' करणें भाग आहे.

शह काटशह:—काटशह करतांच दरम्यानच्या उचललेल्या बुद-बळाचाहि राजास पुनः शह लागला, तर त्यास शह काटशह किंवा इंग्रजींत डबल चेक ( Double check ) असें म्हणतात.

शह काटशहाचा 'ना शह' करण्यास राजासच हलवावें लागतें. अन्य प्रकारानें 'ना शह' होत नाहीं.

शहशह्–राजास शह चुकविण्यास एकच घर राहतें, व तेथेंहि पुनः शह येऊन पूर्वीच्या घरीं जावें लागतें. अशा वेळीं राजास दोनच घरें राहून, दोन्ही घरात शह येतो. त्यास 'शह शह' किंवा इंग्रजींत Perpetual check–पर्पेच्युअल चेक असें म्हणतात.

एक पक्ष दुसऱ्याची सरशी होईल या भीतीनें आणि दुसऱ्याच्या राजास 'शहशह' करता येईल अशी संधि पाहून, त्या संधीचा उपयोग करून घेतो तेव्हा तो डाव बरोबरीचा होतो.

दोघांपैकीं एकाचाहि डाव झाला नाहीं म्हणजे बरोबरी होते.

राजास मोहऱ्याचा शह लागून 'शह' काढण्यास मार्ग नसला म्हणजे त्यास 'मात' म्हणतात.

मार–मात. एका बाजूचें एकच राहिलेलें मोहरें शहानें मेलें म्हणजे बुर्ज होतें, परंतु तो शह असल्या असतां त्या बाजूचा राजा हलविण्यास जागा नसली म्हणजे मात होते व मोहरें मेलें असल्यानें बुर्जिही होते म्हणून याम मारमात म्हणतात. म्हणून हा डाव बुर्जिचेंचा मारउ व मातेंचा कमी मानतात त्यास मार–मात म्हणतात.

( बा. बु. क्रीडेंत यास 'मृतमृत्तिका' हा शब्द दिला आहे. पृष्ठ २२४. )

प्याद्याच्या शहानें मात झाली असता **प्यादेमात** किंवा **प्यादी** म्हणतात.

( 'प्यादी' ह्या विजयास हिंदी पद्धतींत फार महत्त्व आहे. प्रतिपक्षी सरस असेल तर 'प्यादी' देणें हें फार कठीण व बुद्धिचातुर्याचें काम आहे. प्यादें हें सर्वांत दुबळें बुदबळ. त्याचें संरक्षण करून त्याजकडून अखेर प्रतिपक्षाचा राजा जिंकवयाचा, हें सर्व डावाचें ध्येय होऊन, हल्ला व बचाव करताना समयसूचकता, धैर्य, दूरदर्शित्व, कल्पना, युक्तिप्रयुक्ति लढविणें इ. गुणांचा विकास यांत होतो. हा डाव खेळणारे खेळाडू व रणांगणातील आपल्या सेनेच्या हालचाली करणारे सेनापति यांच्या मनोवृत्तींत मुळींच अंतर नाहीं. हिंदु राष्ट्रानें 'प्यादी' या विजयास योग्य महत्त्व देऊन डावात बौद्धिक आनंदाची सूक्ष्म स्थानें निर्माण केलीं असून त्याच्या विकासाची परमोच्च सीमा गाठली आहे ! )

१ **मल्ली.** प्यादींत मल्ली म्हणून एक प्रकार पुढें दिल्याप्रमाणें आहे. पटावर दोन बाजूचे दोन राजे व प्रत्येक बाजूस एकेकच एकाचे मोहरें असून फक्त विजयी पक्षाचें एक प्यादें अधिक राहतें व त्या प्याद्यानें प्यादी झाली म्हणजे तिला मल्ली म्हणतात.

२ या मल्लींत दोन्हीकडे एक एक घोडें, एकेक उंट, एकेक हत्ती, वजीर, असले म्हणजे त्या मल्लीस अनुक्रमें १ घोडमल्ली २ उंटमल्ली ३ गजमल्ली ४ फकीरी किंवा परमहंसी अशीं नांवें आहेत.

**हत्तीमल्ली व घोडमल्ली** हे डाव घोड्याच्या प्याद्यानेंच होतात. इतर मल्ली कोणत्याहि प्याद्यानें होतें.

**कूजी.** एका बाजूची सरशी असून विरुद्ध बाजूचा राजा आपल्या मोहऱ्यांनीं अगर प्याद्यांनीं वेढिलेला असतो. त्याचें खेळण्याचें मोहरें हरेस सापडलें असतें. अशा वेळीं सरस बाजूचा खेळाडू त्यावर डाव करण्याच्या इच्छेनें आपलें मोहरें अशा रीतीनें हलवितो कीं, त्यामुळें विरुद्ध बाजूस खेळण्यास जागाच उरत नाहीं. अशा वेळीं डाव कुजला किंवा **कूजी** ( Stale-mate ) असें म्हणतात.

( त्रिवेंगडाचार्य यांनीं '**कुंठितबंध**' हे नाव दिलें आहे. )

## डावाचा शेवट व त्याचीं विशिष्ट नांवें

बुर्जि:—एक बाजूला राजा, व एक किंवा अधिक मोहरीं आणि दुसऱ्या बाजूला फक्त राजा—मग उभयतांचीं प्यादीं असोत वा नसोत—अशी स्थिति आली म्हणजे ज्याचा नुसता राजा राहतो त्यावर बुर्जि झाली असें म्हणतात. हा सर्वांत लहान विजय मानतात.

इंग्रजी पद्धतींत 'बुर्जि' हा प्रकार मानत नाहींत. मोहरें मेलें तरी अखेरपर्यंत डाव चालवावा लागतो.

(आजपर्यंत 'बुर्जि' या अर्थाचा मूळ संस्कृत शब्द मिळत नव्हता. या. धु. क्री. मध्यें शतऱ्या श्लोकांत 'विंदुकः' हा शब्द त्या अर्थाचा दिला आहे.)

पंचमोहरी—एका बाजूचे राजा व उंट, आणि घोडा, आणि दुसऱ्या बाजूचा राजा आणि उंट अथवा घोडा, असें असून पहिल्यानें दिलेला शह मारून पुनः दोन मोहरीं दोन बाजूस राहतात व डाव बरोबरीचा होतो. एक मोहरें असणारा बुर्जिही करूं देत नाहीं. अशा डावास पंच-मोहरी म्हणतात. दोन्ही बाजूचें एकही प्यादें उरलें नसल्यास ती पंच-मोहरी म्हणजे बरोबरी समजून डावाची अखेर होते, अशी कित्येक ठिकाणीं चाल आहे.

(हा एक 'बरोबरीचा' च प्रकार आहे. त्रिवेंगडाचार्यांनीं पृ. ८२।८५।९२ वर काहीं प्रकार दिले असून शेवटचा डावहि आरंभा-पासून अखेरपर्यंत—आयत बच-प्रकार बरोबरीचा आहे.)

## मारामारी किंवा जोराजोरी

बुद्धिबळें खेळण्याचे दोन प्रकार आहेत.—

१ बळी किंवा जोराजोरी व २ निर्बळी किंवा मारामारी. या-पैकीं, पहिल्या प्रकारांत मोहऱ्यांस व प्याद्यांस एकमेकांचा जोर राहील अशीं तीं खेळतात. जोरांत असलेलें एकमेकांचें बुदबळ परस्परांनीं मारावयाचें नसतें. जें मोहरें किंवा प्यादें निजोरी असेल अथवा होईल, तें तेवढें मारतां येतें. परंतु जोरांत असलेलें बुदबळ काटशहानें मरतें. किंवा जोर करणारें बुदबळ स्वतः स्थिर बसलें असेल, तर त्याच्या

जोराचा उपयोग होत असला, तर जोर असणारें बुदबळ मरतें, किंवा राजाचा जोर एकाद्या बुदबळास असून विरुद्ध पक्षाचे त्यावर दोन जोर झाले, तर तें बुदबळ मारता येतें, आणि एखादें प्यादें सातव्या घरीं असून त्याच्या जोरात एखादें मोहरें असेल, व तें मारलें असता प्याद्यानें मारून जें मोहरें जिवत होणार, तें पटावर जिवत असेल, तर अशा प्याद्याचा जोर नाहीं, असें समजून त्या प्याद्याच्या जोरातील मोहरें मारता येतें. व शेवटीं एकच मोहरें शिल्लक राहिलें म्हणजे मारामारी करता येते. ( बिनजोरातील बुदबळें मारता येतात. )

जोराजोरींत राजा शहाशिवाय हलत नाहीं, परंतु त्यास आपल्या-जवळील बिनजोरी बुदबळ मारण्याकरता हलता येतें; व मागें सांगितल्याप्रमाणें एक मोहरें राहून मारामारीचा प्रकार सुरू होतो. त्यावेळीं दोन्ही राजास शहाशिवाय हलता येतें

*यात प्यादीशिवाय दुसरा डाव होत नाहीं. परंतु शेवटीं एकहि* प्यादें उरलें नसेल तरच मात करता येते. प्यादी होतेवेळेस प्याद्या वरचा मारा चुकविला पाहिजे. जोराजोरीचे खेळाचा प्रचार फार थोडा आहे. हा प्रकार इंग्रजी पद्धतींत नाहीं. यात 'सर्व बुदबळावर जोर ठेवणें ' हेंच महत्त्वाचें आहे.

मारामारी किंवा बिनजोरी ( निर्बळी ) खेळ यात बुदबळास जोर असो अगर नसो, त्याना मारण्याचा हक्क एकमेकास आहे. यात डावपेंच, कौशल्य वगैरेस पूर्ण वाव आहे, म्हणून सर्व देशात याचा प्रसार आहे. *या पुस्तकातील सर्व डाव या प्रकारचेच* आहेत. हा प्रकार आला म्हणजे जोराजोरीचा डाव सहज येतो बुर्जी, मात वगैरे प्रकार यातच आहेत.

### किरकोळ

१. एका घरात एकाशिवाय अधिक बुदबळें येत नाहींत. ( मूळ चतुरंगांत तीं येत. )

### अवश्य खेळी

*मागें डावाची अखेर होण्याचे प्रकार सांगितले आहेत. त्याप्रमाणें* बुर्जि मात वगैरे होण्याचे प्रसंग आले असता, आपलीं मोहरीं मारावयास

देऊन डाव वाचत असल्यास वाचविणें भाग आहे. अशा मारावयास देण्यानें पुढें प्यादीसारखा मोठा डाव होत असेल, तर आमच्यावर बुर्जि किंवा मात झाली-मोहरें बळी देत नाहीं-म्हणून मागत नाहीं. अशा खेळीस अवश्य खेळी म्हणतात.

१ राजास हत्तीचा अगर उंटाचा शह येत असून मात होत आहे, पण वजीर अथवा हत्ती इरेस घालून तीं वाचते, तर तीं मोहरीं इरेस घातलींच पाहिजेत. मातच करा-इरेस घालत नाहीं,असें म्हणता येत नाहीं.

२ लहान मोहऱ्यानीं मात होत असून मात होणाऱ्या घरावर हत्ती, किंवा वजीराचा मारा असेल, तर तीं लहान मोहरीं मारून ते हत्ती वजीर मारावयास दिलेच पाहिजेत.

३ आपलें मोहरें प्याद्यानें फुकट मरत आहे व राजास शह लागला आहे अशा वेळीं प्रथम राजाचा शह अवश्य काढला पाहिजे फुकट मोहरें मरतें, म्हणून शह काढत नाहीं, असें म्हणता येणार नाहीं.

४ एका बाजूचा प्यादा सातव्या घरापर्यंत गेलेल्या असून त्याचें एकच मोहरें शिल्लक असून तें मारलें जातें, अशा वेळीं त्यास बुर्जि झाली, असें म्हणतां येत नाहीं. तें प्यादें आठव्या घरीं नेऊन मोहरें जिवंत केलेंच पाहिजे.

५ घोडा होण्याकरतां गेलेलें प्यादें सातव्या घरी असून,तो होणाऱ्या घरावर उलट बाजूचा मारा नसल्यास, त्या घरापासून कोणत्याही अडीचाच्या घरीं उलट बाजूचा राजा असेल, तर त्या राजास शह न देता घोडा दुसरीकडे खेळणें अवश्य आहे.

## खेळाच्या तीन अवस्था

डावाच्या,सुरवात ( opening ) मध्य ( middle ),व अखेर अशा तीन अवस्था आहेत. सुरवातीची माहिती देणारी इंग्रजींत पुस्तकें आहेत. त्याचा अभ्यास करावा.

मध्य. ( middle ) यात बचाव व हल्ला हा भाग करतानाचालि व बुद्धिचातुर्यानें ठरऊन परपक्षाचें छिद्र पाहून त्यावर मारा करणें या गोष्टीस हली फार महत्त्व देतात. पूर्वी राजाच्या आसनास युद्ध क्षेत्र

होऊन एकमेकावर प्यादी करण्याकडे लक्ष्य असें इच्छीं तसें. नाहीं. तुमची सरशी झाली म्हणजे झालें. रणक्षेत्र कोठेंहि असो.

अखेर. ( end-games ) हे उत्तम खेळाडूचे डाव अभ्यासून शिकावे. विलासमणिमंजरीतील डाव हे अखेरी डावाचे उत्कृष्ट नमुने आहेत.

## खेळाडूचें धोरण

राजास होतां होईल तों शह लागू न देणें, आपल्या बाजूकडील मोहरें शक्य तों जोरी ठेवणें; दुसऱ्या राजास शह देऊन त्यास सरक्षित ठिकाणापासून बाहेर काढणें; दुसऱ्यास आपल्या बाजूस वजीरासारखीं जाड मोहरीं आणण्यास सवड न देणें, आपल्या पक्षाकडील मुख्य मोहरीं दुसऱ्याच्या बाजूस नेऊन त्याची धुळधाण उडविणें; हे हेतु मनात धरून डाव खेळावा. प्रसंग विशेषीं दुसऱ्याची फळी फुटत असेल तर आपले एकादें प्यादें किंवा मोहरें मारावयास देण्याची लालूच दाखवावी. ( यास इंग्रजींत ग्यांबीट–Gambit–देणे म्हणतात. )

---

२. दुसरे बाजीराव पेशवे याची प्रशस्ति आणि ग्रंथरचनेचा उपक्रम—

श्रीबाजी सार्वभौमो निखिलगुणगणश्लाघनीयः कदाचित्।
हर्म्यागारं प्रविष्टः सकलवसुमतीमंडलख्यातकीर्तिः॥
सर्वैः सभ्यैरुपेतो निजसचिववरं दृष्टिपीयूषवर्षैः।
सिंचन्प्रोवाच रम्याक्षरमधुरमिदं सर्वकार्ये कृतार्थः॥ ३॥

सकल पृथ्वीतलावर ज्याची कीर्ति दुमदुमून राहिली असून गुणसंपन्नतेमुळें सर्वांच्या स्तुतीस पात्र होऊन कृतकार्य झालेले असे सार्वभौम श्रीबाजीरावप्रभु एके समयीं आपल्या सभ्य अनुयायासह वाड्याच्या रम्य आवारात आले आणि तेथें आपल्या मुख्य मन्त्र्यावर दृष्टिक्षेपाची अमृतवृष्टि करून त्यानीं पुढील सुंदर मधुर भाषण केलें—

हे धीर त्वं वरेण्यः विमलतरमतिः सर्वकार्येषु दक्षो।
मानी मत्प्रीतिपात्रं ह्यसि परममतः सर्वदेशप्रशस्त्यै॥
ग्रंथो भाव्यो नवीनः सकलजनहितश्चातुरंगप्रधानः।
विद्वांसो राजसंघाः प्रमुदितमनसा शेखरे यं वहेयुः॥ ४॥

"हे सचिवश्रेष्ठ! तुम्हीं फार चतुर, बुद्धिमान्, माझे अत्यंत आवडते असून सर्व कामात दक्ष आहा; माझी इच्छा आहे कीं तुम्हीं चतुरंग (बुद्धिबल) विषयावर असा एक ग्रंथ करवावा कीं, त्याची चहूंकडे वाहवा होऊन विद्वानानीं व राजेलोकानीं त्या ग्रंथास भूषण समजून तो आपल्या मस्तकीं धारण करावा."

३. ग्रंथकाराचें गौरवयुक्त वर्णन करून त्याजकडून ग्रंथ करविणेची श्रीमंत प्रधानास आज्ञा करतात—

श्रीतिर्पतिपुरी शिष्टसंसेव्या यस्य जन्मभूः॥
स इदानीमिहैवास्ते चिरमस्मानुपाश्रितः॥ ५॥
त्रिवेंगडाचार्यसुधीः कविर्यो ह्यष्टावधानादिकलाविलोलः॥
त्वत्प्रीतिपात्रं परमं ततस्त्वं सुसंस्कृतं कारय पद्यजालैः॥ ६॥

" शिष्ट लोकांनीं भरलेली तिरुपतिनगरी ही ज्याची जन्मभूमि आणि जे आमचे बहुत दिवसांचे आश्रित, ते आपले पंडितवर येथेंच आहेत; हे पंडितवर त्रिवेंगडाचार्य, कवि, अष्टावधानी आणि अनेक कलामिज्ञ असून तशात तुमचे फार आवडतेही आहेत. करितां, त्याजकडून वरील ग्रंथ सुंदर संस्कृत भाषेंत पद्ययुक्त असा तयार करवा. "

४. आज्ञेनुरूप प्रस्तुत ग्रंथरचना—

ततस्तद्गुसुधाधीशभव्यचित्तानुसारिणी ॥
सदाशिवप्रधानोपदिष्टां शैलीं विभावयन् ॥ ७॥
चतुरंगविलासस्य तत्त्वं ज्ञात्वा तनोत्यसौ ॥
त्रिवेंगडाचार्यसुधीर्विलासमणिमंजरी ॥ ८ ॥

सदाशिव प्रधानानीं सांगितलेली ही (बाजी) राजाची भव्य कल्पनाशैली मनांत ठेवून, चतुरंगविलासाचें (बुद्धिबळक्रीडेचें) तत्त्व जाणणारा हा (मी) पंडित त्रिवेंगडाचार्य ' विलासमणिमंजरी 'ची रचना करीत आहें.

५. प्रत्येक डाव म्हणजे एक रत्नच अशा भावनेनें ग्रंथावर रत्नस्तबकाचें रूपक—

चतुःषष्टिवराभूल्यरत्नपत्रोपशोभितां ॥
दीर्घरत्नचतुर्नालां षोडशप्रसवोज्वलाम् ॥ ९ ॥
अनर्घ्यैकशिरोरत्नामष्टयुग्मफलावृताम् ।
शतरत्नौघसंचितां परितः स्फुरितप्रभाम् ॥ १० ॥
एनां हि शेखरीकर्तुं कश्चिद्भूयाद्विचक्षणः ॥
विस्तीर्णारत्नगर्भास्याद्वधिर्नोप्यनेहसः ॥ ११ ॥

या मंजरीस पहिल्या चौसष्ट विलास (डाव) रत्नरूपी पानानीं शोभा आली आहे; चार (६५ ते ६८) विलासरत्नांच्या तिला लांब दांडाळ्या आहेत; सोळा (६९ ते ८४) विलासरत्नें हीं तिचीं फुलें; सोळा (८५ ते १००) हीं फळें; एक बहुमोल रत्न हें तिचें अग्र; अशी ही शमर+

+ बेरीज १०१ होते, मूळ पोथींत डाव न. ५९ दिलेलाच नाहीं. —स.

रत्नपुष्पांनीं प्रकाशित व सुगंधित अशी जडलेली व गुंफलेली आहे; ( म्हणजे ह्यात रत्नाचे तेज व फुलाचा सुगंध यांचा मधुर संगम आहे. ) जिच्या पोटीं अनंत रत्नें आहेत अशी वसुंधरा विस्तीर्ण असून कालासही अंत नाहीं; म्हणून कोणी तरी मर्मज्ञ, जिची प्रभा सर्वत्र फांकली आहे अशा या मंजरीस आपल्या मस्तकीं भूषण म्हणून मिरवीलच मिरवील.

६. खेळण्याचे देशपरत्वे भिन्न प्रकार—

अथ परिभाषा—

हिंदुस्थानं च कार्णाटं वैलायतमिति त्रिधा ॥
महाविलासो देशेषु यत्र क्वपि न भेदभाक् ॥ १ ॥
निर्बलं सबलं चेति द्विविधं तत्प्रकीर्तितं ॥
निर्बले निर्बलं हन्यात् सबले तूभयं स्मृतम् ॥ २ ॥

या खेळाचे १. हिंदुस्थानी ( उत्तरेकडील ), २.कर्नाटकी ( दाक्षिणात्य ) व ३.विलायती (युरोपीय) असे खेळण्याचे तीन प्रकार आहेत महाविलास (१०० घराच्या पटावरील) खेळ ज्या ज्या देशांत खेळतात तेथें तो भिन्नप्रकारक नाहीं.

निजोरी व जोरी असाहि खेळण्याच्या दोन तऱ्हा आहेत; पहिल्यात फक्त बिनजोरात असलेल्या बुदबळास मारता येतें; दुसऱ्यांत ही अट नसते.

७. सर्वोत्कृष्ट खेळणारा—

परोक्षमपरोक्षं च तदपि द्विविधं भवेत् ॥
परोक्षक्रीडनं तावत्सर्वदेशप्रशस्तिभाक् ॥ ३ ॥
चतुर्भिश्शास्त्रतत्त्वज्ञैश्चतुर्दिक्षु प्रतिष्ठितैः ॥
यः समं प्रतियुद्धेत समकाले स उत्तमः ॥४॥
एकेन वा पुनर्द्वाभ्यां त्रिभिर्वाऽक्षिनिमीलनैः ॥
प्रतियोद्धाऽपि तत्तुल्यो वाहनारूढ एव हि ॥५॥

हा खेळ परोक्ष ( खेळणाऱ्याचे डोळे बांधून ) व अपरोक्ष (ते न बांधता) असाहि खेळण्यांत येतो. पहिल्या प्रकारचा खेळ तर कोणत्याहि देशांत प्रशंसेस पात्र आहेच.

या खेळाचें शास्त्र व तत्त्व (मर्म) जाणणाऱ्या चौघाजणांस आपल्या चार दिशांस बसवून (चार वेगळ्या पटावर) जो कोणी एकाच वेळीं त्यांशीं डाव चालवितो तो खेळाडू उत्तम होय.

डोळे बांधून खेळणाराचे बाबतींत जो एका किंवा दोघा अथवा तिघा अशा बरोबरीच्या दामनेवाल्याशीं खेळेल तो तर वाहनांतून मिरवणूक काढण्याच्या योग्यतेचा होय.

८. डावांत विजयी होण्याचे प्रकार—

> बुर्जिर्मातुः पेदमातुरिति त्रेधा जयो नृणाम् ॥
> मारुमातुर्विकल्पे तु बुर्जिरेकदेशभाक् ॥ ६ ॥
> एकशेषे प्रमत्तास्युरुष्ट्राश्वगजमंत्रिणः ॥
> उत्तरोत्तरमुन्मादे भटवंधं वरं विदुः ॥ ७ ॥

बुरजी, मात, प्यादेमात (प्यादी) हे विजयाचे अनुक्रमें श्रेष्ठतर प्रकार आहेत. दामनेवाल्याचें पटावरील अखेरचें मोहरें मारून जी मात होते ती वास्तविक बुरजीच आहे; पण तिला कोणी मारमात म्हणतात.

डावांत उंट, घोडा, हत्ती किंवा वजीर हें एकच मोहरें उरलें असतां (प्यादी मुकविण्याकरितां) तें माजविण्यांत येतें; अशा वेळीं जर का उलट बाजूची प्यादी झाली तर तिचें महत्त्व वरील शिलकी असलेल्या मोहऱ्याच्या अनुक्रमानें उत्तरोत्तर अधिकाधिक समजलें जातें.

९. कर्नाटक व मिश्रकर्नाटक पद्धतींतील बुद्धिवळांचें गमनसामर्थ्य—

> नृपतुल्यो भवेन्मन्त्री गमने शकटो भटान् ॥
> उल्लंघ्य याति सदनं द्वयं कोणेन; मानवाः ॥ ८ ॥

परमं सदनं प्राप्य सर्वे ऽमात्यप्रदाः स्मृताः
मुख्यकार्णाटकमिदं तद्विशेषः कथिद्भवेत् ॥ ९॥
एकं द्वीयीन्भटांस्त्यक्त्वा सर्वे हन्या महीक्षितुः ॥
शाहं नैव पदेनायथायथाधादि संभवः ॥१०॥
मिश्रकार्णाटकमिदं ज्ञेयं विबुधसत्तमैः ॥
शेषाः सर्वेऽपि सिद्धांता हिंदुस्थानस्पृशाः स्मृताः ॥११॥

वजीर राजाप्रमाणेंच जातो; उंट प्याद्यावरून उडी मारून तिरकस दोन घरें जातो; प्रत्येक प्यादें शेवटच्या घरीं पोंचल्यावर वजीर होतें; ही कर्नाटकी पद्धत. तींतहि कोठें कोठें फरक आहे तो असा-कोणत्याहि बाजूच्या राजाचीं मुदबळें १।२ किंवा ३ प्यादीं लेरीज सर्व मारतां येतात. घोडा वगैरे (प्याद्याचीं झालेलीं) मोहरीं जिवत होत तीं त्यांनीं शह देता येत नाहीं अशी मिश्रकर्नाटकीची चाल आहे. इतर सर्व नियम बहुधा हिंदुस्थानी पद्धतीप्रमाणेंच आहेत.

(वरील दोनी पद्धतींची आम्हांस बिलकुल माहिती न मिळाल्यानें हें भाषांतर बरोबर असेलच असी खात्री देववत नाहीं— स.)

१०. चिनी वगैरे इतर पद्धति—

चेनादेरल्पसारत्वात्तन्मतं न स्पृशामहे ॥
दुर्बलान्यविधानपक्षान्प्रायो न स्प्रष्टुमुत्सहे ॥१२॥

चिनी वगैरे पद्धतींत फारसें तथ्य नसल्यामुळें व इतर निरनिराळ्या पद्धति गचाळ असल्यामुळें त्यांचें वर्णन करण्याची आमची मनीषा होत नाहीं.

११. मोहऱ्यांचें परस्पर बलाबल—

भटात्सपादस्त्रिगुणस्तुरंगमः ॥
रथस्तु पादोनचतुर्गुणोधिकः ॥
गजस्तु षाड्गुण्यमुपैति, मंत्रवित्
तुल्यो भवेद्द्वादशभिः पदातिभिः ॥ १३ ॥

१४. राजाचा एक विशेष अधिकार; व काहीं प्याद्याची विशेष गति—

अप्राप्तशाहो नृपतिः सकृदश्वगतिं स्पृशेत् ॥ १८ ॥

शह लागण्यापूर्वी राजा केव्हाही एकच वेळ घोड्याप्रमाणें अडीच घरें जातो.

अमात्यनृपनागानां भटा यांति गृहद्वयम् ॥
स्वस्वामिनो निजस्थानादभ्रष्टाःस्युर्न चान्यथा ॥१९॥

राजा, वजीर व हत्ती आपल्या स्थानावरून हालले नसतील तरच त्यांचीं प्यादीं पहिल्या खेळीस एकदम दोन घरें जाऊं शकतात, एरवीं नाहीं.

१५. बुर्जी केव्हा होत्ये—

भटभिन्नं राजबलं सर्वं मोहरसंज्ञकम् ॥
तेषु शिष्टः प्रमत्तः स्यात्तन्मृतिर्बुरजिः स्मृतः ॥ २० ॥
मृतोर्ध्वमविलंबेन यदि जायेत मोहरः ॥
बुरिजिर्न स विज्ञेयः सर्वसिद्धांतकोविदैः ॥ २१ ॥
यदि शाहद्वयं दद्यान्मुहुर्न समतां व्रजेत् ॥
गृहाभावे तु नृपतेरन्यमुख्यबलग्रहः ॥ २२ ॥
बालप्रलपितो यस्मादपसिद्धांत एव सः ॥

प्याद्याखेरीज राजाच्या सर्व सैनिकास 'मोहरीं' म्हणतात. त्यांपैकीं अखेरचें एकच मोहरें उरलें व तें माजल्यामुळें मेलें म्हणजे बुर्जी होत्ये.

पण असें मोहरें मरताच त्याशजूचें एकादें प्यादें आठव्या घरीं जाऊन मोहरें होईल, तर ती बुर्जी नव्हे, असें सर्व शास्त्रवेत्ते मानतात.

राजास तेच ते दोन शह सारखे येत असले तरी ती बरोबरी होत नाहीं आणि अशा प्रसंगीं राजास जाण्यास दुसरें घर नसेल तर त्यानें दुसरें मुख्य मोहरें हरावें असें म्हणणें हा अपसिद्धांत असून शुद्ध बालिश बडबड आहे.

१६. विलायती पद्धत ( बुदवळांच्या चाली )—

वैलायते भटाः सर्वे स्वेच्छया सदनद्वयम् ॥ २३ ॥
गंतुं क्षमाः सकृन्मूलस्थानात्स्युर्यदि नो चलाः ॥
गृहद्वयं भटो गच्छेद्यदि नान्यभटः पथि ॥ २४ ॥
अन्यथा कटहेच्छा चेदंतरा निहतो भवेत् ॥
उत्तमस्थानगाः सर्वे भटाः सर्वप्रदाः स्मृताः ॥ २५ ॥

विलायती खेळांत सर्व प्यादीं, वाटल्यास आपल्या मूळ ठिकाणाहून एकदांच दोन घरें, मध्यें दुसऱ्याचें प्यादें आडवें आलें नसल्यास, जातात. नाहींतर मारामारी करण्याची इच्छा असल्यास तें मध्येंच मारलें जातें. शेवटच्या घरीं प्यादें गेल्यास त्याचें कोणतेंही मोहरें करितां येतें.

राजास सुरक्षित जागीं ठेवणें ( कॅसलिंग Castling )—

सकृत्क्षणेन नागेंद्रमुल्लंघ्य नृपतिर्व्रजेत् ॥
प्रागशाहोऽपि नृपतिः स्वस्थानादच्युतो यदि ॥ २६ ॥

( शह लागला असूनही ) आपल्या स्थानावरून न हललेला राजा हत्तीस ओलांडून ( घोड्याच्या घरीं ) व हत्ती राजास ओलांडून उंटाच्या घरीं एकदम ठेविला जातो. ( यास इंग्रजींत कॅसलिंग म्हणतात. )

मंत्र्याद्येकं नरपतिं सर्वानाहत्य वा पुनः ॥
वध्यो नरपतिर्नित्यं बुरिर्जित्रात्र विद्यते ॥२७॥

विलायती खेळात राजाचे एकूण एक सैनिक मेले तरी डाव न थांबवितां राजावर मात करण्याची असल्यानें त्या खेळात बुर्जी हा डाव नाहीं.

धुळेंप्रतींत पुढील श्लोक आहे; तो आमच्या प्रतींत नाहीं.

भटमोहरबंधो वा ह्यन्यस्मात्स्वस्य बंधनं ॥
प्रतिज्ञातं तु निर्वाहमथ तत्त्वं प्रचक्षते ॥२८॥

प्यादीं, मात, किंवा स्वतःवर डाव करण्यास प्रतियोद्ध्यास भाग पाडणें, यांबद्दल ग्रंथांत वर्णन करण्याची प्रतिज्ञा केली आहे ती पुरी करून तिचें मर्म सांगण्यांत येईल.

( पुढें दिलेल्या डावांत हें मर्म जागजागीं प्रकट केलें आहे.

१७. ग्रंथकर्त्यांचा हेतु—

वैलायतान्महाभेदान्हैंदुस्थानांश्च सर्वशः ॥
वक्ष्यामि विजिगीषूणां जगद्विजयहेतवे ॥२८॥

विजयेच्छूंस जगद्विजय (World-Championship) मिळावा म्हणून, विलायती व हिंदुस्थानी खेळाचे सर्व मुख्य भेद मी सागणार आहे.

१८. ग्रंथातील डाव कसे आहेत—

अभेद्या विषमा वन्धा दुर्गमा विस्मयप्रदाः ॥
निरूप्यंते ऽत्र सकला येस्युर्लोकविलक्षणाः ॥२९॥

यातील सर्व डाव सुटण्यास कठीण, अवघड, आश्चर्यजनक, व लोकविलक्षण असे आहेत.

१९. डावाची मांडणी—

एकद्वित्रिचतुःपंचषट्सप्ताष्टनवाधिकैः ॥
एकविंशतिपर्यंतमादितः क्रमशः स्मृतः ॥३०॥
तदूर्ध्वं तु *यथासंख्यं सपादद्विशतावधि* ॥

आरंभापासून एक, दोन, तीन, चार, पाच, सहा, सात, आठ, नऊ...असे एकवीसपर्यंत क्रमानें चढत्या खेळींत होणारे डाव दिले आहेत. त्यापुढें तें, सख्येनुसार सव्वादोनशें खेळींत होणाऱ्या डावापर्यंत आहेत.

२० पुढें दिलेल्या डावाची लेखनपद्धति ( नोटेशन )—

संख्या नृपार्थकाः शब्दाः कचिद्भवनबोधकाः ॥ ३१ ॥
राजभागस्थिताः सर्वे राजकीया गजादयः ॥
मंत्रिभागे स्थिताः सर्वे मंत्रिणः समुदीरिताः ॥ ३२ ॥
आदौ यस्य गतिः प्रोक्ता प्रथमं तस्यचालनं ॥
तस्यैव विजयो ज्ञेयो यदि नान्यदुदीर्यते ॥ ३३ ॥
नृपद्वयं मंत्रियुग्मं हैंदुस्थाने पराङ्मुखं ॥
वैलायते तु साम्मुख्यं तयोर्भूयात्परस्परं ॥ ३४ ॥

अयं पक्षो गरीयान्स्यात्सुबोधो लिखितुं क्षमः ॥
अतस्तदनुसारेण ज्ञेयं पक्षद्वयं सदा ॥ ३५ ॥
सामान्यफलयोगे तु फलसाम्यमुदीर्यते ॥
अन्यत्रासंभवाद्वापि परिशेषाद्विनिर्णयः ॥ ३६ ॥

अत्र प्रधानाश्वादिशब्दानां मुख्यार्थकत्वेन सर्वत्रोद्धारश्चिंतनीयः ।

[ ३१ व्या श्लोकांतील "नृपार्यकाः" हा पाठ आम्हांस पहावयास मिळालेल्या सर्व पोथ्यांतून असल्यानें तोच मूळांत कायम केला आहे; परंतु त्या पाठाची अर्थनिष्पत्ति आम्हांस झाली नाहीं. खरा पाठ 'नृपाद्यकाः' असा असावा असें समजून भाषांतर केलें आहे. –सं. ]

राजा वगैरे मोहऱ्याच्या नावापुढील अंकवाचक शब्द केव्हां केव्हां त्या त्या मोहऱ्याच्या पट्टींतील तें "घर" याचा निदर्शक आहे.

राजाच्या उजव्या बाजूचीं हीं राजाचीं व वजीराच्या डाव्या बाजूचीं मोहरीं हीं वजिराचीं असें समजणेचें आहे. उदा. राजे ५ = राजाचा घोड्याचे ५ वे घरीं, वज. ७ म्ह. वजीराच्या उंटाचे ७ व्या घरीं.

निरनिराळ्या मैदानांत राजे व वजीर हे एकमेकांसमोर पटावर मांडतात. हिंदुस्थानांत एकाच्या राजासमोर दुसऱ्याचा वजीर अशी मांडणी असते.

उभयपक्षाची खेळात बरोबरी होऊन डाव संपला तर "बरोबरी" असें लिहिलें आहे. डाव होणें शक्य नाहीं, वगैरे प्रसंगीं त्या त्याप्रकारें निर्णय दर्शविला आहे.

या पुस्तकांत 'प्रधान,' 'घोडा' वगैरे शब्दांनीं तीं तीं मोहरीं नेहमीं सांगितलीं आहेत हें लक्ष्यांत ठेवावें.

२१. निरनिराळ्या पद्धतींविषयीं ग्रंथकाराचें मत—

अत्र दाक्षिणात्यचतुरंगविलासस्याल्पबलत्वेन निर्बलस्य च समानपटवन्निपद्यामेघविपमदुर्गकुंठितशक्तिमत्त्वेन चनादेर्नियत-विषयपराहतत्वेन महाविलासस्यातिशयबुद्धिमद्विवेचनीयत्वेपि ... [illegible]

युक्तिपरंपराकवलितत्वेन तत्समशीलतया मतद्वयं सारासारविवेचनाय तत्त्वबुभुत्सोर्व्युत्पत्तिसिद्धये अन्यप्रपंचितनिर्युक्तिकापसिद्धांतसाहस्रसंजनितबहुतरविभ्रमकवलितदुराग्रहोन्मादपरवशतरपरोत्कर्षासहिष्णूनां पंडितंमन्यानां मतिमांद्यप्रकाशनाय च पूर्वोत्तरखंडविभागेन वैशद्येन व्याख्यास्यामः।

दाक्षिणात्य पद्धतींत, जोरी व बिनजोरी खेळण्याच्या प्रकारामुळें अभेद्य व विषम आणि बुद्धीची शक्ति कुंठित करणारे प्रकार आहेत म्हणून; चिनी वगैरे खेळात विशिष्ट हेतु नाहीं म्हणून; महाविलास पद्धतींत अत्यंत बुद्धिमत्ता व विवेचकता लागत असूनही तिचा प्रचार अत्यल्प आहे म्हणून; उत्तरेकडील ( हिंदुस्थानी ) पद्धतीच अत्यंत प्रशंसनीय आहे. विलायती पद्धत देखील अनेक असंबद्ध कल्पनांनीं भासली आहे. यासाठीं दोन्ही पद्धतींतील ग्राह्याग्राह्य भागाचा विचार करून, तत्त्वजिज्ञासूकरिता अखेर सिद्धांत काय आहे हे निश्चित समजावें आणि इतर लोकांनीं हजारों तर्कशून्य अपसिद्धांत पसरले आहेत, त्यामुळें ज्यांच्या बुद्धीस भ्रम होऊन दुराग्रहाच्या पूर्ण आहारीं जाऊन जे परतंत्र झाले व स्वताच मोठे पंडित मानून ज्यांना दुसऱ्याचा उत्कर्ष सहन होत नाहीं, अशांच्या बुद्धिमांद्यावर प्रकाश पाडावा या हेतूनें या ग्रंथाच्या पूर्व आणि उत्तर खंडांत आम्हीं सुस्पष्ट विवेचन करणार आहों.

२२. ग्रंथांत दिलेल्या डावांचा अनुक्रम—

अथ ग्रंथप्रतिपादितबंधानामनुक्रमः॥

आदितश्चतुःषष्टिबंधपर्यंतेषु वैलायतहैंदुस्थानयोरविशेष एव तदूर्ध्वं षोडश शुद्धवैलायतप्रकारेण भटबंधाः ततः शुद्धाः षोडश बंधाः तदूर्ध्वमाद्यंतबंधाश्चत्वार इति क्रमेणैव शतबंधा विज्ञेयाः॥ अथ तेषामनुक्रमसंख्या। एकेन एकः द्वाभ्यामुभयमिति क्रमो विज्ञेयः।

या ग्रंथात पुढें दिलेल्या डावांपैकीं पहिले चौसष्ट हिंदुस्थानी व विलायती, कोणत्याहि पद्धतीनें सोडविता येणारे आहेत. त्यापुढील सोळा केवळ विलायती रीतीनें व नतरचे सोळा केवळ मात करण्याचे डाव आहेत. अखेरचे चार डाव हे सुरुवात उत्तम कोणती व अखेर कशी जिंकावी हें ज्याचे त्यानें प्रयत्न करून पाहण्याकरिता दिलेले आहेत. ( आरभीं थोडी वाट ग्रथकारानें दाखविली आहे.—सं. )

एकानें म्हणजे एक डावात, दोन्हीनीं म्हणजे दोन डावात डावाची अखेर करणें, याप्रमाणें खेळ्याचा क्रम समजावा.

२३. उपसहार—

> कांचीकुंतलचोल ××××× स्थानेषु तत्सुभ्रुवां ॥
> मुक्ताकेतकह्लारहीरकदशां पुष्यंति यत्कीर्तयः ॥
> उद्याद्बाहुबला ××××××× रस्य सेयं कृतिः॥
> बाजीभूपतिभूमिभूषणमणेर्भूपाय बोभूयताम् ॥१॥

( हा श्लोक आम्हास इतर प्रतींत आढळला नाहीं, म्हणून आमच्या पोथींतील नाहींशी झालेलीं अक्षरें इतर प्रतींतून घेऊन तो पुरा करिता आला नाहीं. त्यात बाजीरावाच्या स्तुतीचाच मजकूर असल्यानें माघातर देण्याची जरूर वाटली नाहीं.—स. )

२४. विशेष—उपसहाराचा श्लोक सपल्यानंतर आमच्या प्रतींत कोऱ्या जागेंत दोन चौरस आहेत. एक आठव्या उभ्या ८×८=६४ घराचा असून सर्व घरें कोरीं आहेत. दुसरा १०×१२=१२० घराचा आहे; त्यात आकडे असून फक्त ६ घरें कोरीं आहेत. आकड्यांबद्दल खुलासा केलेला नाहीं. तथापि विचार करता सदर आकडे किती बाजींत किती डाव होतात हें कोष्टकवारीची सख्यावारी दाखवितात असें दिसतें.

पहिला ६४ घराचा चौरस (पट) सर्वांच्या ओळखीचा असल्यानें तो येथें देण्यात आलेला नाहीं.

दुसरें कोष्टक असें आहे—

| बाजी | डाव | बाजी | डाव | बाजी | डाव | बाजी | डाव | बाजी | डाव |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | १ | १३ | १ | ५७ | १ | ११ | १ | ४ | १ |
| २ | २ | १४ | १ | २२५ | १ | १२ | १ | ५ | १ |
| ३ | ३ | १५ | १ | ४ | १ | ० | १ | ५ | १ |
| ४ | ४ | १६ | १ | ५ | १ | ४५ | १ | ५ | १ |
| ५ | ५ | १७ | १ | ६ | १ | ६१ | १ | ६ | १ |
| ६ | ६ | १८ | १ | ६ | १ | ० | ० | ६ | १ |
| ७ | ७ | १९ | १ | ६ | १ | ० | ० | ७ | १ |
| ८ | ६ | २० | १ | ८ | १ | ८१ | २ | ७ | १ |
| ९ | ५ | २१ | १ | ३ | १ | १ | १ | ९ | १ |
| १० | ४ | २६ | १ | ३ | १ | २ | १ | १२ | १ |
| ११ | ३ | ० | ० | ३ | १ | ३ | १ | ३ | १ |
| १२ | २ | ३१ | १ | ३ | १ | ४ | १ | ० | ४ |

१.१ याचा अर्थ —एक बाजींत होणारा डाव एक आहे, ९.५ नऊ बाजींत होणारे डाव पाच आहेत.

बाजी = खेळी.

## सूचना

पुढें दिलेले डाव सोडवितांना पुढील गोष्टी लक्षात ठेवणें अवश्य आहे.

१. विजयीपक्ष=तांबडा अगर पांढरा, जाड्या अक्षरांचा व परपक्ष= हिरवा अगर काळा, बारक्या अक्षरांचा समजावा.

२. पक्ष हा शब्द ग्रंथकारानें योजिला असून "बाजू" या शब्दापेक्षां तो सरस असल्यानें तो रूढ होण्याकरितां तसाच ठेविला आहे. विजयी बाजू ही या ग्रंथांत जाड्या टैपांत छापली आहे. हिंदी पद्धतींत ही तांबड्या रंगाच्या बुद्धिबळाबद्दल असून युरोपियन पद्धतींतील White (पांढरी) बाजू दाखविणारी आहे. परपक्ष म्ह. त्याचे विरुद्ध बाजू.

३. डाव मांडण्याची रीत—

बारका-काळा (हिरवा)

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ८ | ह | घो | उ | व | रा | उ | घो | ह |
| २ | ७ | प्या | प्या | प्या | | प्या | प्या | प्या | प्या |
| ३ | ६ | | | | | | | | |
| ४ | ५ | | | | | | | | |
| ५ | ४ | | | | प्या | प्या | | | |
| ६ | ३ | | | | | | | | |
| ७ | २ | प्या | प्या | प्या | प्या | | प्या | प्या | प्या |
| ८ | १ | ह | घो | उं | व | रा | उ | घो | ह |

जाडा-पांढरा (तांबडा)

४. उत्तरात ग्रंथकारानें विजयीपक्षाच्या सर्व खेळ्या दिल्या आहेत. परपक्षाची एकच खेळी शक्य असेल तर तेथें उत्तरात ग्रंथकारानें ती दिलेली नाहीं. जेथें एकाहून अधिक खेळी आहेत तेथें त्या दिलेल्या आहेत. आणि त्या खेळींमागें + अशी खूण केली आहे. कांहीं ठिकाणीं परपक्षाच्या खेळी आम्हीं दिलेल्या आहेत.

५. प्रश्नात किंवा उत्तरात ग्रंथकारानें डावाच्या ज्या टीपा दिल्या आहेत त्याचेपुढें '–ग्रं०' व संपादकीय टीपास '–सं०' असें लिहिलें आहे.

६. किल्येक डावावरील ग्रंथकाराची टीप सुंदर वाटल्यामुळें ती संस्कृतात देऊन कौंसात तिचें मराठी आहे. टीपा केवळ ग्रंथकाराच्या मराठीचे नमुने म्हणून कांहीं दिल्या आहेत.

या ग्रंथात डाव मांडणेची विलायती नोटेशनची पद्धत मूळ ग्रंथकारानें अवलंबिली आहे. या पद्धतींत राजे व वजीर हे एकमेकाचे *सन्मुख-समोरासमोर-असतात. विजयीपक्षाच्या-आकृतींत दाखविल्याप्रमाणें,* –खेळणाराच्या उजवे हातास राजा व डावे हातास वजीर, बाकीचीं मोहरीं प्रचलित देशी पद्धतीप्रमाणें मांडणेचीं असतात. परपक्ष ( धारका )–याचे डावे हातास राजा व उजवे हातास वजीर असतो. जाडा व धारका यानीं पटावरील अतरें आपआपले बाजूकडून वरील कोष्टकाप्रमाणें मोजणेचीं. आकृतींत दाखविलेलें प्याद्याचें नोटेशन असें:–पाढरें प्यादें हें पाढऱ्या राजाच्या स्थानापासून ४ थ्या घरीं आहे. "*प्यादें–राजाच्या ४ थ्या घरीं*" किंवा संक्षेपानें "*प्या–रा ४,*" तसेंच "काळें प्यादें हें काळ्या वजीराच्या पट्टींत वजीराच्या स्थानापासून ५ व्या घरीं आहे, सबब "काळें प्यादें" वजीराच्या ५ व्या घरीं किंवा "प्या–व ५" असें लिहितात. दोन्हीं पक्षानीं अतरें आपआपलें मोहऱ्याचें पहिलें घर १ धरून तेथून पुढें मोजावीं.

# विलासमणिमंजरी

## पूर्वखंड–प्रथम स्तवक.

[ग्रंथकारानें प्रत्येक डावाची मांडणी संस्कृतांत छंदोबद्ध केलेली आहे. मांडणींतील रचनाचातुर्य संस्कृतांतच व्यक्त होणार आहे; भाषांतरांत तें लोपणारच, शिवाय श्लोकांतील तात्पर्य डावाच्या आमच्या मांडणींत प्रकट होणारच आहे. ग्रंथकारानें आपल्या पद्धतीनें ही मांडणी मराठींतूनहि पुनः लिहिली आहे. तथापि हल्लीं प्रचलित असलेल्या सुधारलेल्या रीतीनें ही योजना आखून, अधिक सुंदर व सुबोध करितां येत असल्यानें आम्ही ती स्वीकारली आहे. या सर्व कारणास्तव संस्कृताचें मराठी स्वतंत्र भाषांतर करून निष्कारण ग्रंथाची पृष्ठसंख्या वाढविण्याचें आम्ही टाळलें आहे. ग्रंथकाराची मूळ मांडणी कशी होती, आणि त्याच्या मराठीचा नमुना कोणत्या प्रकारचा होता याचें दिग्दर्शन मात्र जागेची सवड मिळाली तेथें थोडेंबहुत केलें आहे. ग्रंथकारानें बुद्धिबळांतील सोंगट्यांस (Pieces) या पद्यरचनेंत जीं निरनिराळीं संस्कृत-भाषेंतील नांवें दिलीं आहेत त्यांतील शुद्ध मराठी वाचकांस कदाचित् अपरिचित असतील असें वाटल्यावरून तीं येथें दिलीं आहेत. —सं.]

राजा–इन, ईश नरवरेन्द्र.

वजीर–अमात्य, सचिव, मंत्री.

हत्ती–इभ, करी, कुंभ, कुंजर, दंती, नाग, वारण, स्तंबेरम.

उंट–चक्री, रथ, शताङ्ग, स्यंदन.

घोडा–गंधर्व, घोटक, वाह, वाजि, सप्ति, हरि.

प्यादें–नर, भट, मर्त्य, मानव.

